**वर्कप्लॅन अंतर्गत केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम**
**सन २००९-१० मध्ये राबविण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक-सीपीपी-१६०९/प्र.क्र. ११९/४-अे,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.
दिनांक- १० मार्च, २०१०

**संदर्भ :** **१**) केंद्र शासन, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग,नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक-६-३/२००९, दिनांक ३० जून,२००९ व ९ जुलै, २००९
**२)** शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक - सीपीपी-१६०९/प्र.क्र. ११९/४-अे, दिनांक :- २८ जुलै, २००९
**३**)) केंद्र शासन, कृषि मंत्रालय,कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली, यांचे पत्र क्र. ६-६/२००९- एम एम दिनांक २५ जानेवारी, २०१०
**४)** कार्यासन २ अे, कृषि व पदुम विभाग यांची दिनांक ०३/३/२०१० ची टिप्पणी
**५)** कृषि आयुक्तालयाचे दिनांक ०४/३/२०१० चे पत्र

**प्रस्तावनाः-**

केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन दिनांक ३० जून,२००९ च्या पत्रान्वये सन २००९-१० मध्ये वर्कप्लॅन मधील योजनांना प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. या योजनांमध्ये केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम या योजनेचा समावेश आहे. या योजनेकरिता केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. ३० जून,२००९ च्या पत्रान्वये दिलेली प्रशासकीय मान्यता व दि. ९ जुलै, २००९ च्या पत्रान्वये वितरित केलेल्या पहिल्या हप्त्यातील अनुदानास अनुसरुन दि. २८ जुलै, २००९ च्या शासन निणयान्वये रु. ९७१.०२ लाखाच्या (रुपये नऊ कोटी, एकाहत्तर लाख, दोन हजार फक्त) कार्यक्रमास प्रशासकीय व दि. केंद्र हिश्श्यापोटी रू. ३००.०० लाख ( रू. तीन कोटी फक्त ) व राज्य हिश्श्यापोटी रू. १००.०० लाख ( रू. एक कोटी फक्त ) अशा एकूण रू. ४००.०० लाख ( रू. चार कोटी फक्त ) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात आली. केंद्र शासनाने दि. २५ जानेवारी, २०१० अन्वये दुसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेल्या निधीस अनुसरून केंद्र हिश्श्यापोटी एकूण रु. १६१.०३ लाख (रु. एक कोटी एकसष्ठ लाख तीन हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाने दि. २५ जानेवारी, २०१० अन्वये दुसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेल्या निधीस अनुसरून केंद्र हिश्श्यापोटी एकूण रु. १६१.०३ लाख (रु. एक कोटी एकसष्ठ लाख तीन हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास या शासन निर्णयाद्वारे वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २००९-१० च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**( रू. लाखात )**

| | | |
|---|---|---|
| अ) | **मागणी क्रमांक-डी-३, २४०१ पीक संवर्धन , १०२ अन्नधान्य पिके,**<br>**(केंद्र हिस्सा ७५ टक्के)**<br>**(००)(११) केंद्र पुरस्कृत योजना - तृणधान्य विकास कार्यक्रम (२४०१ ३०९१)**<br>**३३ अर्थसहाय्य.** | **१५१.३०** |
| ब) | **मागणी क्रमांक-डी-३, २४०१ पीक संवर्धन १०२ , अन्नधान्य पिके,**<br>**महाराष्ट्र जिल्हापरिषद. परिषद व पंचायत समित्या अधिनियम १९६१ च्या कलम १२३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (स्थानीक क्षेत्रातील योजना)**<br>**(अर्थोपाय अग्रीमाशी समायोज्य )**<br>**(केंन्द हिस्सा) जिल्हा परिषद ना अर्थसहाय्य**<br>**(००)(२५) एकात्मिक तृणधान्य विकास कार्यक्रम.**<br>**(२४०१ ४६१४) ३१ सहाय्यक अनुदान** | **९.७३** |

२. या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय, पुणे** यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च अर्थसंकल्पित मंजूर तरतुदीच्या मर्यादेत तसेच मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची व संगणकीय अर्थसंकल्पीय प्रणालीद्वारे वितरीत करण्याची जबाबदारी **संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, पुणे** यांची राहील. सदर कार्यक्रम संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक २८ जुलै, २००९ मधील परिच्छेद ३ मध्ये नमूद कार्यपध्दती नुसार राबविण्यात यावा.

३ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

**४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४ अे / १०/ व्यय - १ , दिनांक २४/२/२०१० नुसार व प्रधान सचिव ( कृषि ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.**

**५.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३१७१८१९२७००१ असा आहे.**

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(वि.मा.बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे.(१० प्रती)
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
विभागीय आयुक्त (सर्व),
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व).
जिल्हाधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) )
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित,
आरे दुग्ध कॉलनी गोरेगांव(पूर्व),मुंबई ६५.
मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद(सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन, कृषि नगर,अकोला.
संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन,पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई (२ प्रतीत).
महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
नियोजन विभाग, (कार्यासन - १४३१) , मंत्रालय, मुंबई ३२.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभागा, मंत्रालय, मुंबई ३२.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई ३२.
वित्त विभाग, व्यय-१, अर्थसंकल्प-१३,
सर्व सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन)
मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव.

